जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत मौ. राजुरा (ता. मालेगाव, जि. वाशिम) नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जजिमि- २०२१/प्र.क्र. १५५ /पापु-१३**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**तारीख: १५ डिसेंबर, २०२१.**

**वाचा**

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम यांचे प्रशासकीय मंजुरीचे आदेश, दि.२४.०५.२०१९

२) कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, वाशिम यांचे मूळ तांत्रिक मान्यता आदेश, दि.१६.०५.२०१९

३) कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद, वाशिम यांचे सुधारित तांत्रिक मान्यता आदेश, दि.११.११.२०२१

४) कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, वाशिम यांचे पत्र क्र/ग्रापापुवि/ तांशा/१४०९/२०२१, दि.२८.१०.२०२१

**प्रस्तावना**

मौ. राजुरा (ता. मालेगाव, जि. वाशिम) नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.१२८.१२ लाख इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम यांनी दि.२४.०५.२०१९ च्या आदेशान्वये मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद, वाशिम यांनी मूळ अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता दि. १६.०५.२०१९ अन्वये प्रदान केली आहे. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद, वाशिम यांनी प्रस्तुत योजनेमधील तांत्रिक बदलासह सुधारित अंदाजपत्रकास दि.११.११.२०२१ रोजी सुधारित तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या तांत्रिक बदलासह सुधारित आराखड्यास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्र क्र.४ अन्वये शासनास सादर केला होता. तद्अनुषंगाने प्रस्तुत योजनेच्या सुधारित आराखड्यास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

जल जीवन मिशन कार्यकमातंर्गत मौ. राजुरा (ता. मालेगाव, जि. वाशिम) नळ पाणी पुरवठा योजनेतील तांत्रिक बदलासह रु.१,४३,३३,५००/-(ढोबळ) (अक्षरी एक कोटी त्रेचाळीस लाख तेहतीस हजार पाचशे फक्त) एवढ्या सुधारित किमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी:-**

१) उपरोक्त नमूद सुधारित किंमतीत योजनेची सर्व कामे विहित कालावधीत पूर्ण करण्यात यावीत.

२) या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारित तांत्रिक मान्यता देताना नमूद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३) सदर योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरून) यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्रह नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/ जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

४) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, वाशिम यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतीचे अधिकारी यांनी योजनेचे संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

५) सदर योजना पूर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज संस्थेने (संबंधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हस्तांतरीत करून घेणे व चालविणे बंधनकारक राहील. तद्नंतर योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६) १०० टक्के नळ जोडणीबाबत आवश्यक ते नियोजन ग्रामपंचायतीकडून करण्यात यावे.

७) जल जीवन मिशनच्या दृष्टीने आतापर्यंत दिलेल्या नळ जोडणीची नोंद तपासणे व यापुढे देण्यात येणाऱ्या नळ जोडणीबाबत आयएमआयएस प्रणालीवर माहिती वेळेत नोंदविणे आवश्यक आहे.

८) सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१ टक्के पाणी पुरवठा योजना या देखभाल दुरुस्ती अभावी , वीजदेयक न भरल्यामुळे (Poor maintenance / nonpayment of electricity bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद यांची राहील.

९) हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

१०) प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारित केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

०२. या योजनेच्या सुधारित किमंतीतील वाढीव खर्च रु.१५.२१ लाख (अक्षरी रुपये पंधरा लाख एकवीस हजार फक्त ) हा मागणी क्र. वाय-०२, जिल्हा परिषद योजनांतर्गत अनुदाने (०२) (१५) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना राष्ट्रीय ग्रामीण पयेजल कार्यक्रम यासाठी अनुदान (केंपुयो-राज्य हिस्सा) (कार्यक्रम)३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) लेखाशीर्ष (२२१५ २०७१) या लेखाशिर्षाखालील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

०३. या योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता ही वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ मधील भाग पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ६, परिच्छेद क्र.२७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२१५०९५६०१२०२८असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANI DEELIPRAO DEOKATE

Digitally signed by RANI DEELIPRAO DEOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b0869a90562f87b9afb32e69166c729b50fd795952e7aeb9091b613d5a868aa7, pseudonym=EBDDE6E6DC46959920B4201DA4C1EADA80A905B3, serialNumber=BBD64806F9A7A26899A43E3A95A0566B762C44B895D6316615D2932D87DEFEEE, cn=RANI DEELIPRAO DEOKATE
Date: 2021.12.15 17:55:22 +05'30'

( राणी दि. देवकत्ते )
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद
४. मा. विधानमंडळ सदस्य (सर्व)
५. महालेखापाल,महाराष्ट्र-१,मुंबई (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
६. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
७. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग,
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
९. जिल्हाधिकारी, वाशिम
१०.संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
११.मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता समिती,सिडको भवन,बेलापूर
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम
१३.कार्यकारी अभियंता ,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद,वाशिम.
१४. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१५. मुख्य अभियंता तथा वि.का.अ.पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुबई.
१६. निवडनस्ती पापु-१३, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.